**सांगली जिल्हयातील जत तालुक्यात स्वतंत्र नवीन अप्पर तहसिल कार्यालय स्थापन करण्यास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक प्राफेब २०१५/ प्र.क्र.७१/ म-१०**
मंत्रालय, पहिला माळा, मुख्य इमारत
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
मुंबई- ४०००३२.
**दिनांक: १० ऑगस्ट, २०१७**

<u>वाचा</u>:- जिल्हाधिकारी, सांगली यांचे पत्र क्र. मह-२/ प्रशासन २/ आरआर ४७/१७, दि. १४ मे,२०१६

<u>**प्रस्तावना:-**</u>

सांगली जिल्ह्यातील जत तालुक्याची वाढणारी लोकसंख्या, मोठे क्षेत्रफळ, झालेले नागरीकरण,दुष्काळग्रस्त भाग इ. बाबींमुळे सध्याच्या जत तालुक्यातील तहसील कार्यालयावर कामाचा मोठा ताण पडत असल्यामुळे प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने सांगली जिल्ह्यातील जत तालुक्यातील संख येथे स्वतंत्र अप्पर तहसिलदार कार्यालय स्थापन करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय** :-

सांगली जिल्हयातील जत तालुक्यातील संख येथे स्वतंत्र अप्पर तहसिलदार कार्यालय स्थापन करण्यास व त्याअनुषंगाने पुढील प्रमाणे पद मंजूरीस व अन्य अनुषंगिक बाबीस या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे :-

१) विद्यमान सांगली जिल्हयातील जत तहसिल कार्यालय बळकट करण्याच्या दृष्टीने अप्पर तहसिलदार संख यांच्या नवीन कार्यालयासाठी खालील २ पदे नियमित वेतनश्रेणीवर मंजूर करण्यास शासन मान्यता देत आहे. तसेच सदर पदे ही सध्याच्या त्या- त्या संवर्गाचा एक भाग राहतील.

| अ.क्र. | पदाचे नाव | वेतनश्रेणी (रु.) | मंजूर पदांची संख्या | एकूण |
|---|---|---|---|---|
| १ | अप्पर तहसिलदार | १५६००-३९१००, ग्रेड पे-५०००/- | १ | १ |
| २ | लिपिक- टंकलेखक | ५२००-२०२०० ग्रेड पे-१९००/- | १ | १ |

२) या नवीन कार्यालयासाठी आवश्यक असणारी नायब तहसिलदार १ पद, अव्वल कारकून १ पद, व लिपिक- टंकलेखकांची ३ पदे अशी ५ पदे विभागीय आयुक्त, पुणे यांनी संबंधित जिल्ह्यातील तहसिलदार कार्यालयात कार्यरत असलेल्या पदांपैकी नव्याने स्थापन करावयाच्या अप्पर

तहसिलदार कार्यालयासाठी स्थलांतरणाने उपलब्ध करुन देण्याची कार्यवाही करावी व नवीन कार्यालय तातडीने कार्यान्वित करावे.

३) सांगली जिल्ह्यातील तहसिलदार कार्यालय, जत तसेच अप्पर तहसिलदार कार्यालय, संख यांचे कार्यक्षेत्रात खालीलप्रमाणे महसूली मंडळे व गावे राहतील:-

| अ. क्र. | कार्यालयाचे नाव | महसुल मंडळे | महसुली गावे |
|---|---|---|---|
| १ | तहसिलदार, जत जि. सांगली | एकूण मंडळे - ४<br>जत (१६ गावे), डफळापुर (१५ गावे),<br>शेगांव (१३ गावे), कुंभारी (१४ गावे) | ५८ |
| २ | अप्पर तहसिलदार, संख, ता. जत जि. सांगली | एकूण मंडळे - ४<br>संख (२२ गावे), उमदी (१८ गावे),<br>माडग्याळ (१४ गावे), मुचंडी (१३ गावे) | ६७ |

४) सांगली जिल्हयातील तहसिलदार, जत तसेच अप्पर तहसिलदार, संख,ता. जत यांच्या कार्यक्षेत्रातील महसूल मंडळांतर्गत तलाठी साझे व त्यामध्ये अंतर्भूत होणा-या गावांची यादी प्रसिद्ध करण्याबाबतची कार्यवाही जिल्हाधिकारी, सांगली यांचे स्तरावर करण्यात यावी.

५) अप्पर तहसिलदार, संख ता. जत जि. सांगली यांचे प्रतिवेदन अधिकारी उपविभागीय अधिकारी, कवठे महांकाळ हे राहतील आणि त्यांचे नियंत्रक अधिकारी म्हणून जिल्हाधिकारी, सांगली हे काम पाहतील.

६) अप्पर तहसिलदार संख ता.जत जि. सांगली यांना या शासन निर्णयान्वये कार्यालय प्रमुख तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

७) महाराष्ट्र जमीन महसूल संहिता,१९६६ च्या कलम १३ पोटकलम (३) नुसार तहसिलदार जत जि. सांगली यांना प्रदान करण्यात आलेल्या शक्ती अप्पर तहसिलदार, संख त्यांना नेमून दिलेल्या कार्यक्षेत्रापुरत्या प्रदान करण्याबाबत स्वतंत्रपणे अधिसूचना निर्गमित करण्यात येईल.

८)सांगली जिल्हयातील जत तालुक्यात संख येथे अप्पर तहसिलदार कार्यालय स्थापन करण्याकरीता येणारा खर्च “मागणी क्र. सी-१, २०५३, जिल्हा प्रशासन, (०१) (०९३) जिल्हा आस्थापना (०१) सर्वसाधारण आस्थापना (०१) (०३) आयुक्त, पुणे संगणक सांकेतांक ( २०५३ ००६४)” या लेखाशीर्षाखाली दर्शविण्यात यावा व तो सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा. मंजूर तरतूद अपुरी पडत असल्यास आठमाही अंदाजपत्रक सादर करताना वाढीव तरतूदीची मागणी करावी व ते शक्य नसल्यास पूरक मागणीचा प्रस्ताव सादर करण्यात यावा.

९) सदरहू शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व नवीन पदनिर्मिती, पदांचे पुनरुज्जीवन व पदांचे आढावे इत्यादी प्रस्तावांची सखोल तपासणी करण्यासाठी स्थापन केलेल्या उच्चस्तरीय सचिव समितीच्या चक्रीय पध्दतीने दिनांक ०५.०८.२०१७ रोजी दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २०१७०८१०१७४१०७५६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्य राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

K. P. Wadte

Digitally signed by K. P. Wadte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=092f3d18dd73e55dfcdc33acd72708a0290e9758bc4e1500205b182e2d843c82, cn=K. P. Wadte
Date: 2017.08.11 13:01:53 +05'30'

**(कि.पां. वडते)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यापालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई-४०००३५.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
३. मा.मंत्री / मा. राज्यमंत्री (महसूल ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
४. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
५. अप्पर मुख्य सचिव (रवका), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
६. अप्पर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
७. अप्पर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
८. अप्पर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
९. अप्पर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१०.अप्पर मुख्य सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
११.मुख्य निवडणूक अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१२.विभागीय आयुक्त, पुणे
१३.जिल्हाधिकारी, सांगली
१४.उपविभागीय अधिकारी, कवठे महांकाळ, जिल्हा सांगली
१५.तहसिलदार, जत जिल्हा सांगली
१६.अप्पर तहसिलदार, संख,ता. जत जि. सांगली
१७.जिल्हा कोषागार अधिकारी, सांगली
१८. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
१९.कार्यासन अधिकारी, महसूल व वन विभाग ( कार्यासन ई-३/ई-८/ई-९/ई-१०/ब-१)
२०.वित्त विभाग ( का. विसू-१/ अर्थसंकल्प -६/ व्यय-९/ आ.पु.क.), मंत्रालय मुंबई
२१.महसूल व वन विभागातील सर्व कार्यासने
२२.निवड नस्ती-कार्यासन म-१०